

# कालीचा

# स्वरविलास

आजपासून खूप खूप,
हज्जारो वर्षापूर्वी.....





एका मुलाने आपल्या आईला गुहेच्या
भिंतीवर जनावरांची चित्र रेखाटतांना पाहिले.
त्याला ती खूप आवडली.
जंगलामधे हुबेहुब अशीच जनावरे होती.



'काली, आता तू लवकरच मोठा होशील. मोठा झाल्यावर तुला या जनावरांची शिकार करायची आहे' कालीची आई त्याला म्हणाली.



कालीच्या वडिलांनी त्याला धनुष्य दिले. म्हणाले, ' तुझ्या पहिल्या शिकारीसाठी या धनुष्याने सराव कर.'



काली दिवसभर धनुष्याच्या सहाय्याने
बाण मारण्याचा सराव करत राहिला.

दिवसभर सराव करून दमल्यावर विश्रांती घेतांना
चुकून त्याने धनुष्याची दोरी छेडली.
आणि मंजूळ आवाज त्याने ऐकला.
त्याने पुन्हा दोरी छेडली, धनुष्य तोंडाजवळ आणून
तोंडाची उघडमीट केली.
धनुष्यामधून वेगवेगळे सूर ऐकू आले.



मग काय..., काली धनुष्याने बाण मारणे विसरूनच गेला.
धनुष्याची दोरी छेडून नवीन नवीन सूर काढण्यात रमून गेला.
त्याचे भान हरपून जायला लावणारे सूर ऐकून आकाशातील
तारेही खाली झेपावले.





त्या रात्री धनुष्यामधून निर्मिलेल्या संगीतामुळे
काली शांत, निवांत झोपला.

मग काय... धनुष्याचा सराव करण्यासाठी काली रोज जंगलात जाऊ लागला. गुहेपासून लांब आल्यावर तो बाण बाजूला ठेवून, धनुष्य तोंडावर ठेवून दोरी छेडित असे. निर्माण होणारे मधूर संगीत ऐकण्यासाठी चिमण्या त्यांचा किलबिलाट बंद करीत असत. इतर प्राणी थांबून कालीच्या संगीताचा आस्वाद घेत असत.





वडिलांनी कालीला धनुष्याच्या सरावाबद्दल विचारले तेव्हा सुरांत हरवून गेलेल्या कालीने डोळे मिटून घेतले व म्हणाला, 'छान!'



एके दिवशी सुर्योदयाच्यावेळी कालीने पाहिलं की बरेच लोक मोठ्या शिकारीसाठी बाहेर पडले आहेत. त्याच्या धनुष्याच्या दोर्या ताणलेल्या होत्या आणि बाणही अणकुचिदार केलेले होते.

धट्टीकट्टी माणस पुढे होती. त्याच्यामागून लहान मुले उत्साहाने धावत होती. त्यांनी डोंगर, दर्या, मैदान पार केली. शेवटी त्यांच्या म्होरक्याला काही जनावर दिसली. कालीने इतकी सुंदर भिमकाय जनावरे पूर्वी कधीच पाहिली नव्हती.



त्या सुंदर, महाकाय जनावरांना पहाण्यासाठी काली एका टेकडीवर चढला. त्या सुंदर जनावरांना बघून तो त्याची शिकार करायचे विसरूनच गेला. त्याच्या धनुष्यामधून बाहेर पडणारे सुरेल सुरच त्याला आठवले.

कालीने आपले बाण गवतावर खाली ठेवले आणि धनुष्य तोंडाजवळ आणून दोरी छेडायला सुरवात केली.

डोळे बंद करून धुंद
करणार्या सुरावटी तो
वाजवत राहिला.....
वाजवत राहिला.



कालीने डोळे उघडले तेव्हा त्याच्या लक्षांत आले की ती सुंदर महाकाय जनावरे त्याच्या अगदी जवळ आली आहेत आणि संगिताचा आस्वाद घेत आहेत.



काही वेळाने बाकिचे शिकारी तिथे पोहोचले. त्यांनी पाहिले की काली आपल्या धनुष्यामधून सुमधूर संगीत निर्माण करतो आहे. धनुष्याची दोरी छेडली की सूर निर्माण हेत आहेत.



ते पाहून शिकार्यानी त्यांचे धनुष्य बाण खाली ठेवले.

कालीने आपल्या धनुष्याने जनावरांना न मारता त्यातून निर्माण केलेल्या संगीताने मंत्रमुग्ध करून टाकले. एखादा जादूगारच असे करू शकतो. काली कुणीतरी मोठा जादूगार असला पाहिजे.





ही गोष्ट जेव्हा कालीच्या आईला समजली तेव्हा तिने जनावरांनाही भान हरपायला लावणार्या कालीच्या सुरावटीच्या गोष्टीचे चित्र रेखाटले. ते पाहून कालीला खूप आनंद झाला.

काली जब बड़ा हुआ तब
लोग उससे सलाह लेने आते.



काली मोठा झाल्यावर लोक त्याच्याकडे सल्ला मागण्यासाठी येत असत. काली आजारी लोकावर इलाज करीत असे.



काली आपल्या पूर्वजांच्या आत्म्याबरेबर संवाद साधू शकत असे.

वयाने मोठा झाल्यावर, म्हातारा काली रोज संध्याकाळी टेकडीवर जाऊन बसत असे व डोळे बंद करून सुरांची आराधना करीत असे. ते मंत्रमुग्ध करणारे सूर ऐकायला आकाशीचे तारेही खाली येत असत.



